**भूसंपादन अधिनियमानुसार संपादनाची कार्यवाही करतांना ग्रामीण भागातील प्रकल्पबाधीत क्षेत्राच्या गावठाणातील घराची/ इमारतीचा मोबदला / नुकसान भरपाई देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-संकिर्ण-०१/२०१५/प्र.क्र.१३६(भाग-१)/अ-२**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक:- ०३ जूलै, २०१७.

**वाचा :-** शासन निर्णय समक्रमांक दि.२ जुलै, २०१६

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय दि.२ जुलै, २०१६ नुसार भूसंपादन अधिनियमानुसार भूसंपादन प्रक्रिया करतांना ग्रामीण भागातील प्रकल्पबाधित क्षेत्राच्या गावठाणातील घरे/इमारती बाधित होत असतील तर सदर मालमत्तेचे मूल्यांकन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करुन घेण्यात येत असते. तथापी विदर्भातील बऱ्याचशा सिंचन प्रकल्पामध्ये पुनर्वसन अंतर्भुत असून पुनर्वसनाची कामे व मालमत्ता मूल्यांकनाची कामे होत असतात. शासन निर्णय दि.२ जुलै, २०१६ नुसार सिंचन प्रकल्पातील बाधीत घरांचे मूल्यांकन हे सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सोपविल्याने या कामास अधिक कालावधी लागण्याची शक्यता आहे. त्यामुळे याचा परिणाम प्रकल्पाच्या प्रगतीवर होत असतो. सिंचन प्रकल्पाची कामे जलद गतीने पूर्ण करण्यासाठी सिंचन प्रकल्पामुळे बाधीत होणाऱ्या घरांचे मूल्यांकन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांऐवजी जलसंपदा विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करून घेण्याबाबत शासनाकडे सातत्याने विचारणा करण्यात येत आहे. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय दि.२ जुलै, २०१६ नुसार भूसंपादन अधिनियमानुसार भूसंपादन प्रक्रिया करतांना ग्रामीण भागातील प्रकल्पबाधित क्षेत्राच्या गावठाणातील घरे/इमारती बाधित होत असतील तर सदर मालमत्तेचे मूल्यांकन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करुन घेण्यात येत असते. तथापी आता फक्त जलसंपदा विभागांतर्गत सिंचन प्रकल्पामुळे ग्रामीण भागातील गावठाणातील बाधित होणाऱ्या घरांचे / इमारतींचे मूल्यांकन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार जलसंपदा विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करून घेण्यात यावे. तथापी अशा प्रकारे जलसंपदा विभागाच्या सक्षम अधिकारी यांच्याकडून केलेल्या मूल्याकनासंदर्भात उद्भवणाऱ्या बांबींशी सार्वजनिक बांधकाम विभागाचा संबंध येत नसल्याने त्याची सर्वस्वी जबाबदारी जलसंपदा विभागाच्या संबंधित सक्षम अधिकाऱ्यांची राहील.

२. सदरचे आदेश फक्त जलसंपदा विभागांर्तगत सिंचन प्रकल्पाकरीता लागू राहील.

सदर शासन निर्णय जलसंपदा विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्र.१८४/मो.प्र.-२, दि.३.३.२०१७, अनौपचारीक संदर्भ क्र.१३८९, दि.७.४.२०१७ व अनौपचारीक क्र.१५०/व्यय-९, दि.६.५.२०१७ रोजीच्या प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०७०३१५२५१७१५१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash K Gawade

Digitally signed by Subhash K Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40b8b2876e2135f5b158b877f59754b2a7ddf64e0cf59f2dc33ad60b8bce5bcd, cn=Subhash K Gawade
Date: 2017.07.03 15:26:17 +05'30'

**( सु.कि.गावडे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव(जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व विभागीय आयुक्त
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) संचालक ,नगर रचना, पुणे
१५) सर्व अधिक्षक अभियंता, (सार्वजनिक बांधकाम /जलसंपदा)
१६) सर्व जिल्हा सरकारी वकील
१७) निवडनस्ती (अ-२).